महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम,१९६७ ची
नियम पुस्तिका अद्ययावत करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सेप्रनि-२००९/प्र.क्र.१४८/आस्था-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ६ जानेवारी,२०११.

वाचा: १) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक सेप्रनि- २००६/प्र.क्र.१५६/आस्था-९, दिनांक १८ नोव्हेंबर,२००६

२) शासन शुध्दीपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: सेप्रनि-२००९/प्र.क्र.१५६/आस्था-९ दिनांक ९ जानेवारी,२००७

३) शासन निर्णय, ग्रा.वि.व ज.सं.वि.,क्रमांक -सेप्रनि-२००९/प्र.क्र.१४८/आस्था-९, दिनांक २८ मे, २००९

४) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे यांचे पत्र क्रमांक-जिग्राविंय/ठाणे/स्वीस/३०९/२०१०, दिनांक २८/१२/२०१०

**प्रस्तावना** :- महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ ची अद्ययावत नियम पुस्तिका दिनांक ३१ जुलै,१९९१ पर्यंत सुधारित करण्यात आली असून त्या नियम पुस्तिकामध्ये दिनांक ३१ जुलै,१९९१ पर्यंतच्या ज्या दुरुस्त्या करण्यात आल्या त्यांचा समावेश करुन सदर पुस्तिका अद्ययावत करुन उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. सदर नियम पुस्तिका जुलै,१९९१ पर्यंत अद्ययावत असून जुलै,१९९१ पासून ते आजतागायत शासनाने वेळोवेळी नियमात दुरुस्त्या केल्या असून त्या सर्व दुरुस्त्या अंतर्भूत करुन एक सर्वसमावेशक अद्ययावत नियम पुस्तिका छपाई करण्यासाठी व नियम सुधारणेच्या अनुषंगाने आवश्यक असल्यास शासनास शिफारशी करण्यासंदर्भात उपरोक्त संदर्भ क्रमांक १ , २ व ३ च्या शासन निर्णयान्वये एक समिती गठित करण्यात आली होती.

परंतु, समितीच्या अध्यक्षांसह इतर सदस्यांच्या व सदस्य सचिवांच्या विभागाबाहेर इतरत्र बदल्या झाल्याने तसेच नियम पुस्तिकेतील सुधारणा करण्याबाबतची कार्यवाही तातडीने करता यावी म्हणून काही नवीन सदस्यांचा समितीत अंतर्भाव करण्याबाबत समितीच्या सदस्य सचिवांनी संदर्भ क्रमांक-४ येथील पत्रान्वये सूचविले आहे. सदस्य सचिवांनी केलेली सूचना विचारात घेवून समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार संदर्भीय शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेली समितीमध्ये अशंत फेरबदल करुन पुढील प्रमाणे पुनर्रचित समिती गठित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय:-** आता खालीलप्रमाणे पुनर्रचित समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) | अध्यक्ष | श्री. पारस बोथरा,खाजगी सचिव, मा.मंत्री (शालेय शिक्षण ),मंत्रालय,मुंबई. |
| २) | सदस्य | श्री. मो.हु.गु.हु. मुजावर, अवर सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| ३) | सदस्य | श्री. राजा जवळेकर, उप आयुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर. |
| ४) | सदस्य | श्री. एस.बी.बेझलवार, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली |
| ५) | सदस्य | श्री. बाळासाहेब जगताप, उप आयुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय, कोंकण विभाग, नवी मुंबई |
| ६) | सदस्य | उपमुख्य कार्यकारी अधिकारी (आस्थापना ), जिल्हा परिषद, ठाणे. |
| ७) | सदस्य | उपमुख्य कार्यकारी अधिकारी (आस्थापना ), जिल्हा परिषद, औरंगाबाद. |
| ८) | सदस्य सचिव | श्री. ए.एच.बगाटे, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे. |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली आहे:-

(१) शासनाने निर्गमित केलेल्या जुलै,१९९१ ते आजतागायत अधिसूचनांचे/दुरुस्ती नियमांचे एकत्रीकरण करणे.

(२) एकत्रित अधिसूचनांमध्ये/दुरुस्ती नियमामध्ये कालानुरुप किंवा प्रशासकीय कारणास्तव आवश्यक त्या सुधारणा करण्याबाबत शासनास शिफारस करणे.

(३) उपरोक्त १ व २ बाबींचा एकत्रित इंग्रजी व मराठीमध्ये अंतरिम मसूदा शासकीय मुद्रणालयाकडे पाठविण्यासाठी शासनाच्या मान्यतेसाठी सादर करणे.

(४) शासनाने मान्यता दिलेल्या मसुदयाचे नियम पुस्तिकेच्या रुपात छपाई करणे

(५) शासनाने सोपविलेल्या अन्य बाबी.

३. वरील कार्यकक्षेच्या अनुषंगाने समितीने आवश्यकते प्रमाणे बैठका आयोजित करुन तीन महिन्याच्या आंत सदर अद्ययावत नियम पुस्तिका छपाईचे काम करणे आवश्यक आहे व सदर कामकाज परिपूर्ण करण्याच्या दृष्टीने समितीला नियम पुस्तिकेच्या अनुषंगाने ज्या-ज्या कागदपत्रांची आवश्यकता असेल असे सर्व कागदपत्रांची विहित मुदतीत संबंधित जिल्हा परिषदेने पूर्तता करणे बंधनकारक राहील व या कामी लागणारा खर्च उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०११०६१८१९०२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्रकाश हिर्लेकर )

शासनाचे सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,

मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव

मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक,

मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई

महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर

मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,

प्रधान सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई,

सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

श्री. पारस बोथरा, खाजगी सचिव, मंत्री (शालेय शिक्षण ) , मंत्रालय, मुंबई .

श्री. राजा जवळेकर, उप अयुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.

श्री. एस.बी.बेझलवार, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.

श्री. मो.हु.गु.हु. मुजावर, अवर सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

श्री. ए.एन.बगाटे, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद ठाणे.

श्री. बाळासाहेब जगताप, उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोंकण विभाग, नवी मुंबई.

विभागीय आयुक्त (सर्व)

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य प्रशासन ), जिल्हा परिषद, ठाणे व औरंगाबाद.

संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री, मुंबई

व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.

निवड नस्ती (आस्था-९), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२